राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील वैधानिक विकास मंडळासाठी असलेली ९ पदे **दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्र:- आस्थाप २०२१/प्र.क्र.७४/राजभ**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २५ मार्च, २०२५

**वाचा:-** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.आस्थाप-२०२१/प्र.क्र.७४/२०-अ, दि.२०.०९.२०२४
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.राजभ-२०२१/३९९/प्र.क्र.१७६/ राजभ, दि.०८.०१.२०२५
३) राजभवन सचिवालयाचे पत्र क्र.राजभ/रास/आस्था/प्र.क्र.३३/अस्थायी पदे/२०२५/५६७, दि.०७.०३.२०२५
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक:- पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५

**शासन निर्णय**:-

राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील वैधानिक विकास मंडळासाठी असलेल्या ९ अस्थायी पदांना, सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०९.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे.

२. संदर्भीय २ येथील शासन निर्णय, दि.०८.०१.२०२५ अन्वये राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांचा सुधारीत आकृतीबंध मंजूर करण्यात आला आहे. त्यामध्ये राज्यपालांच्या सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील वैधानिक विकास मंडळाच्या कामासाठी सदर मंडळे अस्तित्वात असेपर्यंतच्या कालावधीसाठी निर्माण केलेली ९ पदे राजभवनाच्या आस्थापनेवर तशीच अस्थायी स्वरुपात सुरु ठेवण्यात यावीत असा निर्णय उच्चस्तरीय सचिव समितीने दि.०७.०६.२०२१ च्या बैठकीत घेतल्याचे नमूद आहे.

३. वित्त विभागाच्या दि.०३.०३.२०२५ च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याचे प्रशासकीय विभागास अधिकार आहेत. सदर अधिकार तसेच उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.०७.०६.२०२१ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार राज्यपलांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील सोबतच्या परिशिष्टामध्ये दर्शविलेली **वैधानिक विकास मंडळाच्या ०९ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.**

४. सदर पदांवर होणारा खर्च सोबतच्या परिशिष्टातील स्तंभ २ मध्ये नमूद पदासमोर स्तंभ ६ मध्ये दर्शविलेल्या लेखाशिर्षाखालील सन २०२४-२०२५ व सन २०२५-२६ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०३.०३.२०२५ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२५१५५३२२५१०७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KRANTI BHIMRAO PATIL

Digitally signed by KRANTI BHIMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=82bdf2956da62b4fc2f658725d7587906d3cf8eb3117ad97f90ef418d0d39a41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB4EDEE9A9967B63A896631DCC4A6E70FF0378E5AF6387779BF67DE75ED5B49, cn=KRANTI BHIMRAO PATIL
Date: 2025.03.25 15:54:11 +05'30'

**(क्रांती पाटील)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत : परिशिष्ट**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५.
२. मा. राज्यपालांचे परिवार प्रबंधक, राजभवन, मलबार हिल, मुंबई-४०० ०३५.
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
४. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (राज्यपालांचे सचिव कार्यालयामार्फत)
६. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
७. वित्त विभाग, व्यय-४, अर्थसंकल्प-१४, वित्तीय सुधारणा, आ.पु.क., मंत्रालय, मुंबई-३२ .
८. कक्ष अधिकारी, कार्यासन-अर्थसं, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
९. निवड नस्ती (का. राजभ).

# परिशिष्ट

## शासन निर्णय क्र.आस्थाप-२०२१/प्र.क्र.७४/राजभ, दि. २५ मार्च, २०२५ चे सहपत्र

## राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील वैधानिक विकास मंडळासाठी असलेली अस्थायी पदे

| अ.क्र. | पदनाम व वेतनश्रेणी | संख्या | पदनिर्मितीचा शासन निर्णय क्रमांक व दिनांक | दि.२८.०२.२०२५ पर्यंत पदे चालू ठेवण्याचा घेण्यात आलेला शासन निर्णय क्रमांक व दिनांक | लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| **राज्यपालांचे सचिव कार्यालयाच्या आस्थापनेवरील वैधानिक विकास मंडळाची अस्थायी पदे** | | | | | |
| **१.** | राज्यपालांचे उप सचिव (संवर्ग पद) | १ | शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. आरएजे-१०९४/ ३९१/प्र.क्र.२५/९४/ २०-अ, दि.३१.०३.१९९४ | शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक:- आस्थाप-२०२१/ प्र.क्र.७४/२०-अ, दि.२०.०९.२०२४ | ए-१, २०१२, राष्ट्रपती, उपराष्ट्रपती, राज्यपाल, संघराज्य क्षेत्राचे प्रशासक, भारीत, ९०- सचिवालय, (००)(०१) सचिवालय, ०१-वेतन, संगणक संकेतांक क्र.२०१२ ००१४ |
| **२.** | सह संचालक (गट-अ) (तात्पुरत्या स्वरुपात पद उन्नत) (मुळ पद संशोधन अधिकारी) एस-२५ : ७८८००-२०९२०० | १ | शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र. आरएजे-१००९/ ५७२/प्र.क्र.२७८/०९/ २०-अ, दि.२.१२.२००९ | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे |
| **३.** | लघुलेखक (उच्च श्रेणी) एस-१६ : ४४९००-१४२४०० | १ | शासन निर्णय सा.प्र.वि. क्र.आरएजे-१०९४/३९१/ प्र.क्र.२५/९४/२०-अ, दि.३१.०३.१९९४ | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे |
| **४.** | सहायक लेखा अधिकारी एस-१५ : ४१८००-१३२३०० | १ | शासन निर्णय सा.प्र.वि. क्र.आरएजे-१०९४/९८०/ प्र.क्र.७९/९४/२०-अ, दि.२४.१०.१९९४ | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| ५. | सहायक कक्ष अधिकारी<br>एस-१४ : ३८६००-१२२८०० | १ | शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. आरएजे -१०९४/ ३९१/ प्र.क्र.२५/९४/२०-अ, दि.३१.०३.१९९४ | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे |
| ६. | लिपिक-टंकलेखक<br>एस-०६ : १९९००-६३२०० | १ | शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. आरएजे -१०९४/ ३९१/ प्र.क्र.२५/९४/२०-अ, दि.३१.०३.१९९४ | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे |
| ७. | वाहन चालक<br>एस-०६ : १९९००-६३२०० | १ | शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. आरएजे -१०९४/ प्र.क्र.३२/९४/२०-अ, दि.२४.०१.१९९४ | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे |
| ८. | बहुद्देशीय शिपाई<br>एस-०१ : १५०००-४७६०० | २ | शासन निर्णय सा.प्र.वि. क्र. आरएजे-१०९४/ ३९१/प्र.क्र.२५/९४/२०-अ, दि.३१.०३.१९९४ | वरील प्रमाणे | वरील प्रमाणे |
| **एकूण पदांची संख्या** | | ९ | | | |

KRANTI
BHIMRAO PATIL

Digitally signed by KRANTI BHIMRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=82bdf2956da62b4fc2f658725d7587906d3cf8eb3117ad97f90ef418d0d39a41, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4CB4EDEE9A9967B63A896631DCC4A6E70FF0378E5AF6387779BF67DE75ED5B49, cn=KRANTI BHIMRAO PATIL
Date: 2025.03.25 15:54:38 +05'30'

(क्रांती पाटील)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन